जवाहरलाल नेहरु नागरी पुनरुत्थान अभियान
राजीव आवास योजनेकरीता सुकाणू अभिकरणाची
नियुक्ती करणेबाबत....

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग
शासन निर्णय क्र.राआयो-२०११/प्र.क्र.४/गृनिधो-२(सेल)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. १३.०१.२०११

वाचा : १.राजीव आवास योजना व झोपडपट्टी मुक्त शहरांचा आराखडा तयार करण्याकरीता केंद्र शासनामार्फत निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना
२. शासन निर्णय क्र.जनयो-२००६/प्र.क्र.४६/गृनिधो-२, दि.१८.९.२००६

**शासन निर्णय**

केंद्र शासनाच्या प्रस्तावित राजीव आवास योजनेची प्राथमिक मार्गदर्शक तत्वे व झोपडपट्टी मुक्त शहरांचा आराखडा तयार करण्याकरीता केंद्र शासनाने मार्गदर्शक तत्वानुसार राजीव आवास योजनेच्या अंमलबजावणीकरीता विविध प्राथमिक तयारी करण्यात येत आहे. त्यात राज्यस्तरीय सुकाणू अभिकरणाची नियुक्ती करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती. यापूर्वी जवाहरलाल नेहरु नागरी पुनरुत्थान अभियानांतर्गत शहरी गरीबांना मुलभुत सुविधा पुरविणे व एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरीता या विभागाच्या दि.१६.९.२००६ च्या शासन निर्णयाव्दारे महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांची राज्यस्तरीय सुकाणू अभिकरण म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. त्यांच धर्तीवर राजीव आवास योजनेच्या अंमलबजावणीकरीताही महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांची राज्यस्तरीय सुकाणू अभिकरण म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

राज्यस्तरीय सुकाणू अभिकरणाची कार्यकक्षाः

(१) नागरी स्वराज्य संस्थांकडून/अंमलबजावणी यंत्रणांकडून झोपडपट्टीमुक्त शहर करणेबाबत तपशीलवार प्रकल्प प्रस्ताव (डीपीआर) मागविणे,
(२) प्रस्तावांचे तांत्रीक व वित्तीय मुल्यांकन स्वतः किंवा बाह्य अभिकरणांकडून करून घेणे,
(३) केंद्र व राज्य शासनाकडून येणाऱ्या निधीचे व्यवस्थापन करणे,
(४) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वांनूसार निधीचे वितरण करणे, योजनांचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच भौतिक व आर्थिक त्रैमासिक अहवाल केंद्रशासनास सादर करणे,
(५) नागरी स्वराज्य संस्था व सुकाणू अभिकरण यांना वितरीत केलेल्या निधीचे लेखापरिक्षण करून घेणे.

(६) योजनेच्या अनुषंगाने राज्य शासनामार्फत वेळोवेळी सोपविण्यात येणारी कामे करणे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०११९१९५४१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

( प्र.पु.बडगेरी )
अवर सचिव, गृहनिर्माण विभाग

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, (पत्राने)
२. मा.मख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
६. मुख्य अभियंता-२, राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, जेएनएनयुआरएम, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
७. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, नागपूर,
९. संबंधित महानगरपालिका/नगरपालिका
१०. संबंधित जिल्हाधिकारी
११. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१२. वित्त नियंत्रक / मुख्य अभियंता-१, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे, मुंबई-४०० ०५१.
१४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१५. मुख्य अधिकारी, पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, पुणे/नाशिक/ औरंगाबाद /नागपूर,
१६. वित्त विभाग (व्यय-३ कार्यासन, अर्थसंकल्प १७ व अर्थोपाय कार्यासन), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७. नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८. सामाजिक न्याय व सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२१. उप संचालक (एम) भारत सरकार, शहर कार्या आणि रोजगार मंत्रालय, शहरी रोजगार व दारिद्रय निर्मुलन विभाग( संनियंत्रण कक्ष) निर्माण भवन, नवी दिल्ली (नोंदणीकृत डाकेने)
२२. सह संचालक, लेखा व कोषागारे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई,
२३. उप सचिव / सर्व अवर सचिव /कक्ष अधिकारी , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२४. अवर सचिव/रोखशाखा व आहरण व संवितरण अधिकारी , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
२५. निवड नस्ती / गृनिधो-२(सेल) कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.